**विशेष असाधारण रजा योजना मुदतवाढ.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अरजा-२४०४/प्र.क्र.५६/०४/सेवा-८**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक: १४ जानेवारी, २००५**

**संदर्भ:** (१) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अरजा-२४०२/२५/सेवा-८, दिनांक ७ ऑक्टोबर २००२.**
(२) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अरजा-२४०२/२५/सेवा-८, दिनांक २५ ऑगस्ट २००३.**
(३) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अरजा-२४०४/०१/सेवा-८, दिनांक ३ फेब्रुवारी २००४.**
(४) **शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक अरजा-२४०४/प्र.क्र.५९/ सेवा-८, दिनांक १४ मे २००४.**

**प्रस्तावना :-** शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अरजा-२४०२/२५/सेवा-८ दिनांक ७ ऑक्टोबर, २००२ अन्वये शासकीय कर्मचाऱ्यांना "विशेष असाधारण रजा योजना" लागू करण्यात आली आहे. या योजनेची मुदत दिनांक ३१.१२.२००४ रोजी संपत असून या योजनेस मिळणारा प्रतिसाद पाहता, ही योजना पुढे चालू ठेवण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-** विशेष असाधारण रजा योजनेची मुदत दिनांक ३१.१२.२००४ नंतर पुढील एक वर्षापर्यन्त म्हणजेच दिनांक १.१.२००५ पासून ते दिनांक ३१.१२.२००५ पर्यन्त वाढविण्यात यावी. या योजनेस पुढील एक वर्षाकरिता मुदतवाढ देतांना शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अरजा-२४०२/२५/सेवा-८ दिनांक ७ ऑक्टोबर, २००२ मध्ये विहित करण्यात आलेल्या तरतूदी तसेच तद्नंतर उपरोल्लिखीत अनुक्रमांक २ ते ४ येथील शासन निर्णयान्वये वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणा कार्यान्वीत राहतील.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**अनघा परब**
**शासनाचे अवर सचिव**

प्रति,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर (८० प्रती),
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई (४० प्रती),
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),

महालेखापाल (वाणिज्य लेखापरीक्षा) मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई (४० प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय मुंबई,
मुख्य लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधिकाराखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
वित्त विभागातील सर्व कार्यासने, (ग्रंथपाल ५ प्रती),
निवड नस्ती, कार्यासन सेवा-८, वित्त विभाग,
* पत्राने.